अतिरिक्त आयुक्त(पशुसंवर्धन) या पदावर
पदोन्नती देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन आदेश क्रमांक :- पसंप्र-२०१४/प्र.क्र.७९/पदुम-१
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ३०.०५.२०१५

शासन आदेश

१. पशुसंवर्धन विभागांतर्गत खाली नमूद केलेल्या प्रादेशिक सहआयुक्त संवर्गातील अधिकाऱ्यांना अतिरिक्त आयुक्त, या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांना त्यांच्या नांवासमोर दर्शविलेल्या ठिकाणी पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याच्या पदस्थापनेचे ठिकाण | पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | डॉ. दौलत हरी गायकवाड | प्रादेशिक सहआयुक्त(पशुसंवर्धन), मुंबई | अतिरिक्त आयुक्त तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला. |
| २. | डॉ. सुरेश परशुराम सावंत | प्रादेशिक सहआयुक्त (पशुसंवर्धन), नाशिक | अतिरिक्त आयुक्त (मुख्यालय), पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे. |

२. हया पदोन्नतीस पुढील ११ महिन्यांकरिता किंवा निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता मिळेपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत मान्यता देण्यात येत आहे.

३. वरील पदोन्नती T.A.No.१/२०१४, T.A.No.२/२०१४ (रिट याचिका क्रमांक ८४५२/२००४) संदर्भात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक २८.११.२०१४ रोजी दिलेल्या निर्णयातील निर्देशांच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. उपरोक्त अधिका-यांनी त्यांचे पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्यानंतर त्यांचे वेतननिश्चिती विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत दयावा. विहित कालमर्यादेमध्ये विकल्प न दिला गेल्यास त्यांची वेतननिश्चित महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधी ११(१)(ए) खाली पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात येईल.

५. उपरोक्त अधिकाऱ्यांना नवीन पदावर हजर होण्यासाठी त्यांच्या नियंत्रण अधिकाऱ्यांनी त्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

६. संबंधित अधिकारी यांनी पदोन्नतीच्या पदावर हजर न होता लोकप्रतिनिधीमार्फत पदस्थापनेमध्ये बदल करण्याबाबत शासनावर दबाव आणल्यास ते महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, ११७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्रा ठरतील याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी

७. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.mah.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतिक क्रमांक २०१५०५२९१४१९०१२३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल याच्या आदेशानुसार व नांवाने

Patil Bhaskar Raghunath

Digitally signed by Patil Bhaskar Raghunath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Patil Bhaskar Raghunath
Date: 2015.05.30 18:17:01 +05'30'

**( भा. र. पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (पदुम), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५) उपसचिव (पदुम), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सर्व प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला.
९) महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१
१०) निवडनस्ती पदुम-१